अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील उपसंचालक,
गट-"अ" (राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या
बदलीबाबत

# महाराष्ट्र शासन
## नियोजन विभाग
## शासन आदेश क्रमांकः इएसटी १०१८/प्र.क्र. ४६/का.१४२७

मादामा कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : ३१ जुलै, २०१८

संदर्भ - शासनाचे आदेश क्रमांक - बदली ११८/प्र.क्र.३३/का.१४२७, दिनांक २० जून , २०१८

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ चे कलम ४(१), ४)२) व ४(३) मधील तरतूदीनुसार अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील उपसंचालक, गट-"अ" (राजपत्रित) (रुपये १५६००-३९१०० अधिक ग्रेड वेतन रुपये ५४००) या संवर्गातील अधिकारी श्री.सं.भ.कोलगणे, जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, लातूर यांची संदर्भाधिन आदेशान्वये करण्यात आलेली बदली रद्द करण्यात येत आहे.

२. सदर अधिनियमातील कलम ४ (४) मधील तरतुदीनुसार, अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील उपसंचालक, गट-"अ" (राजपत्रित) (रुपये १५६००-३९१०० अधिक ग्रेड वेतन रुपये ५४००) या संवर्गातील खालील अधिकाऱ्यांची बदली करण्यात येत असून त्यांची पदस्थापना स्तंभ क्रमांक ४ मध्ये दर्शविल्याप्रमाणे करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव व पदनाम | सध्याचे कार्यालय | बदलीनंतरचे पद व कार्यालय |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १ | श्री.सु.आ.थोरात,<br>जिल्हा नियोजन अधिकारी | जिल्हा नियोजन समिती,<br>जिल्हाधिकारी कार्यालय,<br>जिल्हा नांदेड | जिल्हा नियोजन अधिकारी<br>(मानव विकास),<br>मानव विकास समिती,<br>जिल्हा नांदेड |
| २ | श्री.सं.भ.कोलगणे,<br>जिल्हा नियोजन अधिकारी | जिल्हा नियोजन समिती,<br>जिल्हाधिकारी कार्यालय,<br>जिल्हा लातूर | जिल्हा नियोजन अधिकारी,<br>जिल्हा नियोजन समिती,<br>जिल्हाधिकारी कार्यालय,<br>जिल्हा नांदेड |

३. संबंधित कार्यालयप्रमुखांनी संबंधित अधिकाऱ्याच्या पदाचा कार्यभार अन्य अधिकाऱ्याकडे सोपवून त्यास तात्काळ कार्यमुक्त करावे तसेच कार्यमुक्तीनंतर संबंधित अधिकाऱ्यांनी बदली केलेल्या पदावर तात्काळ रुजू व्हावे व त्या पदाचा कार्यभार स्वीकारावा.

४. बदली आदेशात बदल करुन घेण्यासाठी प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाब आणण्याचा प्रयत्न केल्यास तो अधिकारी शिस्तभंगविषयक कारवाईसाठी पात्र ठरेल.

५. बदली झालेले अधिकारी बदलीच्या कार्यालयात रुजू झाल्यानंतर त्यांनी तात्काळ संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्याशी संपर्क साधून ई-प्रोफाईल अद्ययावत करण्याची कार्यवाही सात दिवसांच्या आत करावी. अद्ययावत केलेले ई-प्रोफाईल संबंधित कार्यालयाने संबंधित अधिकाऱ्याच्या त्या

महिन्याच्या वेतन देयकासोबत कोषागार कार्यालयास सादर केल्याशिवाय त्यांचे वेतन देयक कोषागार कार्यालयाने पारित करु नये. तसेच अद्ययावत ई-प्रोफाईलच्या प्रती संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय व शासनास पाठविण्यात याव्यात. ई-प्रोफाईल अद्ययावत करण्याची जबाबदारी संबंधित कार्यालयप्रमुखांची राहील.

६. काही अधिकारी बदली आदेशाचे पालन करीत नाहीत. त्यामुळे प्रशासकीय कामकाजामध्ये अडथळा निर्माण होतो असे निदर्शनास आले आहे. यास्तव, याबाबत दिरंगाई झाल्याचे व शासन आदेशाचा भंग झाल्याचे निदर्शनास आल्यास संबंधितांविरुध्द शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात येईल, याची नोंद घ्यावी.

७. संबंधित कार्यालयप्रमुखांनी बदली करण्यात आलेल्या अधिकाऱ्यास कार्यमुक्त केल्याबाबतच्या व रुजू करुन घेतल्याच्या आदेशाची प्रत या विभागास अग्रेषित करावी.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७३११३००४८३३१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.**

Priyanka Ranjan Chhapwale

Digitally signed by Priyanka Ranjan Chhapwale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2295c5c50b6a2aa03b2654fd2f5f69a709a20ae44359c483f3e1b0d4450728d0, cn=Priyanka Ranjan Chhapwale
Date: 2018.07.31 16:12:53 +05'30'

**( प्रियांका रं. छापवाले )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित अधिकारी (मार्फत:- अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई)

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर
२. मा.मंत्री (नियोजन)/मा.राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. आयुक्त, मानव विकास आयुक्तालय, औरंगाबाद
४. विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त यांचे कार्यालय, औरंगाबाद
५. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, नांदेड/ लातूर / औरंगाबाद
६. जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड/ लातूर
७. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
८. सहसंचालक, प्रादेशिक कार्यालय, औरंगाबाद
९. उप आयुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त यांचे कार्यालय, औरंगाबाद
१०. उपसंचालक (प्रशासन), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
११. अपर मुख्य सचिव (नियोजन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१२. निवड नस्ती.